मा.मंत्री (बंदरे) व मा.राज्यमंत्री (बंदरे) यांच्यामध्ये
बंदर विभागाचे कामाचे वाटप व विभागणी

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक संकीर्ण २००३/प्रक्र.८८/पीआरटी-२
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२. दिनांक : २९ नोव्हेंबर, २००३.

भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद १६६ खाली तयार केलेल्या नियम १५ अन्वये शासनाच्या कार्यनियमावली संबंधी दिलेल्या सूचनेतील सूचना ४ मधील तरतूदीच्या अनुषंगाने मा.मंत्री(बंदरे) हे सदर सूचनेतील बाबीव्यतिरिक्त गृह विभागाखालील गृह (बंदरे) विभागाच्या कामाबाबतचे आदेश खाली नमूद केल्याप्रमाणे देत आहेत :-

**अनुसूची (अ)**
**मा.मंत्री (बंदरे) यांना सादर करावयाची प्रकरणे**

(१) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाची रचना व सदस्यांची नियुक्ती
(२) महाराष्ट्र सागरी मंडळाचे विभागीय सल्लागार परिषदेची रचना व नियुक्ती.
(३) महाराष्ट्र सागरी मंडळाला द्यावयाचे निदेश आणि सागरी मंडळाच्या संदर्भातील धारणविषयक बाबी.
(४) बंदर विषयक धोरण आखणी तसेच जलवाहतूकीचे धोरण विषयक महत्वाचे निर्णय.
(५) इतर राज्यांबरोबर करावयाचे आंतरराज्य जलवाहतूक करार.
(६) लहान बंदरे घोषित करणेबाबत व बंदरांचा विकास.
(७) बंदर विभागाचे जमीन व इमारतीविषयीच्या बाबी.
(८) लहान बंदरांचा हायड्रोग्राफिक सर्व्हे.
(९) बंदर विभागाचे राजपत्रित अधिकारी वर्गाच्या आस्थापनाविषयक बाबी.
(१०) महाराष्ट्र सागरी मंडळाचे अर्थविषयक व धोरणात्मक बाबी.
(११) अनुसूची (अ) आणि (ब) येथे नमूद नसणारे विषय.
(१२) बंदर विषयक कामाचे बांधकामासंबंधीचे रु.२५लाखापेक्षा अधिक खर्चाचे बांधकामास प्रशासकीय मान्यता देणे .
(१३) बंदरे विभागातील अराजपत्रित कर्मचारी वर्गाच्या आस्थापनाविषयक बाबी

**अनुसूची (ब)**
**मा.राज्यमंत्री (बंदरे) यांनी सादर करावयाची प्रकरणे**

(१) महाराष्ट्र सागरी मंडळाचा वार्षिक प्रशासन अहवाल.
(२) विधानसभा/विधानपरिषद विषयक सर्व विधीमंडळ बाबी.
(३) विधीमंडळ बाबींवर विधानमंडळात देण्यात आलेली आश्वासने.
(४) वरील (अ) अनुसूचीमध्ये नमूद प्रकरणे सोडून महाराष्ट्र सागरी मंडळासंबंधीची सर्व प्रकरणे.
(५) बंदरावरील कार्यालये व निवासस्थाने
(६) बंदरातील पाण्याची व्यवस्था व विद्युतीकरण.
(७) लाईट हाऊसेस लाईटशीप डॅकॉन वॉईल.
(८) सॅनिटरी व्यवस्था.
(९) वेटींगशेड इत्यादी.

**अनुसूची (क)**

**मा.राज्यमंत्री (बंदरे) यांचेमार्फत मा.मंत्री (बंदरे) यांना सादर करावयाची प्रकरणे.**

(१) महाराष्ट्र सागरी मंडळाचे आर्थिक अंदाजपत्रक व योजना.

(२) सागरी मंडळाचे कर्जाबाबत हमी.

(३) सानुग्रह अनुदान.

(४) केंद्र शासनाने नियुक्त केलेल्या बंदरविषयक सल्लागार परिषदा/अभ्यास गट/ समित्याबाबत.

(५) बंदर विषयक कामकाजा संबंधीचे अधिनियम/नियम व नियंत्रण आदेश (भारतीय बंदर अधिनियम १९०८, लँडींग अँड व्हॉईजफ्रीज अॅक्ट १९८२, मर्चंट्स अँड शिपिंग अॅक्ट १९८५, सागरी मंडळ अधिनयम १९९६ इत्यादी)

(६) जलवाहतुकीशी संबंधीत विविध अधिनियम / नियम यातून सूट मंजूर करण्याबाबत.

(७) यंत्रावर चालणाऱ्या जहाजांच्या संबंधात देशांतर्गत जलमार्गावरील नौवहन व नौपरिवहन आणि राष्ट्रीय जलमार्गाच्या संबंधातील भारतीय संविधानाच्या अनूसुचीतील सूची १ मधील तरतूदीच्या अधीनतेने अशा जलमार्गावरील मार्गाचे नियम, देशांतर्गत जलमार्गावरील प्रवासी व माल याची वाहतूक.

(८) कोस्टल व्हेसल्स अॅक्ट.

(९) आंतर्देशीय जलवाहतूक.

(१०) नौवहन व विमानयांचे सुरक्षेकरिता दीपगृहे चसह प्रकाशनौका, संकेतदीप व इतर तरतूदी.

(११) फेरीज.

(१२) सर्व खाडीतील अंतर्गत जलवाहतूक,

(१३) जेट्टी बांधणे,

(१४) अंतर्गत स्टीम व्हेसल्स अॅक्ट १९१७.

(१५) लाईट हाऊसेस अॅक्ट १९१८.

(१६) कँटीन रिफ्रेशर्मेंट वगैरे.

उप सचिव व कक्ष अधिकारी यांना प्रदान करण्यात आलेल्या शर्तीनुसार इतर सर्व प्रकरणांबाबत कार्यवाही करावी आणि सर्वसाधारण स्वरुपाच्या कामाबाबत प्रचलित पध्दतीनुसार किंवा पूर्व पिठीकेच्या आधारे कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

( अशोक चव्हाण )
मा. मंत्री (बंदरे)

प्रति,

मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन मुंबई .
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
मा.राज्यमंत्री (बंदरे)
मा.अ.मु.स. (बंदरे/परिवहन/रा.ऊ.शु)
मा.मुख्य सचिवांचे स्वीय सहायक,
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई - ३८.
मुख्य बंदर अधिकारी, मुंबई .
किनारा अभियंता, मुंबई .
गृह विभागातील सर्व सह सचिव/उप सचिव/कार्यासन अधिकारी.